औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह येथे स्थानिक रित्या
औषधे खरेदी बाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग.

शासन निर्णय क्र. एमएजे-११९२/१[१७८]/पीआरएस-२,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२, दिनांक : २८ मार्च, १९९३.

वाचा :- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. एमईडी/औमका/
१८७६/१९९२/कक्ष-३, दिनांक २१.९.१९९२ व दि. ४.३.१९९३.

निर्णय :- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिपत्याखाली असलेले औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह येथील दवाखाना विभागातील अत्यावश्यक स्वरूपाचा औषधाचा साठा संपल्याने अधिक्षक, औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह यांनी मुख्य वैद्यकिय अधिकारी, यांच्या सल्ल्यानुसार माहे मार्च, १९९२ मध्ये स्थानिक रित्या औषधांची खरेदी केलेली आहे. या रु. २६२५/- [रुपये दोन हजार सहाशे पंचवीस फक्त] च्या औषधांच्या खरेदी खर्चास शासन या आदेशाद्वारे कार्योत्तर मंजुरी देत आहे.

२. यासाठी झालेला खर्च "२०५६-तुरुंग-१०१[१] तुरुंग-इतर खर्च" या लेखाशीर्षाखाली सन १९९२-९३ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यास शासन मंजुरी देत आहे.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर-४५४ /९२/व्यय-८, दि. ३१.१०.१९९२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ अ. ल. पाटील ]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
कारागृह उपमहानिरीक्षक, [मुख्यालय], महाराष्ट्र राज्य, पुणे,
कारागृह उपमहानिरीक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद,
अधिक्षक, औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा व अनुज्ञेयता], मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा परिक्षा], मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग, व्यय-८,
निवड नस्ती.